रेशीम लाभार्थ्यांना विविध योजनेतंर्गत साहित्य पुरवठाबाबतच्या मार्गदर्शक सुचना विहीत करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
शासन निर्णय क्रमांकः रेशीम १०१२/ प्र.क्र.१०/ रेशीम कक्ष
मंत्रालय, मुंबई -३२
दिनांक : १३ फेब्रुवारी, २०१५.

**वाचा :- शासन समक्रमाकिंत दि.२५ जानेवारी, २०१२ चे, २०१२ चे पत्र**

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्रातील भौगोलिक परिस्थिती , हवामान,उच्चमुल्यांकीत पीक रचना, व ग्रामिण भागात रोजगार निर्मिती या सर्व बाबीचा विचार केल्यास तुती लागवडीद्वारे रेशीम उत्पादनास भरपूर वाव आहे. ही बाब विचारात घेवून शासनाने तुती लागवड व टसर क्षेत्रामध्ये चार ते पाच पटीने वाढ करण्याचे निश्चित केले आहे.

राज्यात केंद्र पुरस्कृत सी.डी.पी योजना, राष्ट्रीय कृषि विकास योजना, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामिण रोजगार हमी योजना ( मग्रारोहयो ) इ. च्या माध्यमातून रेशीम विकासाचा कार्यक्रम राबविण्यात येत आहे. याकरीता शेतक-यांना विविध बाबीकरीता अनुदान उपलब्ध करून देण्यात येते. यामध्ये प्रामुख्याने तुती लागवड, ठिंबक सिंचन, साहित्य पुरवठा, लाभार्थी बळकटीकरण योजना, टसर शेतक-यास साहित्य पुरवठा, कोष पश्यात प्रक्रीया बळकटीकरण व प्रोत्साहनात्मक अनुदान इ. उपलब्ध करण्यात येते. रेशीम शेती ही इतर पिकापेक्षा वेगळी असल्यामुळे यामध्ये तुती बाग जोपासना व व्यवस्थापन, किटक संगोपनाच्या शास्त्रोक्त पध्दतीवर अवंलबून आहे. याकरीता केंद्रीय रेशीम मंडळाने विकसीत केलल्या तंत्रज्ञानातील यांत्रिकीकरणाचा प्रभावी वापर शेतकऱ्यापर्यंत पोहचविणे , कोष उत्पादकता वाढूवन शेतक-यांना आर्थिक उत्पन्नाची हमी निर्माण करणे इ. महत्वाच्या बाबी आहेत. हया बाब विचारात घेवून केंद्र पुरस्कृत योजनेतंर्गत तसेच रा.कृ.वि.योजनेतंर्गत तुती लागवड ते किटक संगोपनासाठी आवश्यक असणा-या साहित्याकरीता शेतक-यांना अनुदान उपलब्ध करून देण्यात येते.

सद्य:स्थितीत राज्यात साहीत्य पुरवठा योजनेतंर्गत केंद्रीय पध्दतीने रेशीम संचालनालयस्तरावरून साहित्य खरेदी करून त्याचा पुरवठा शेतकऱ्यांना करण्यात येतो. यामध्ये सर्व प्रक्रीया करण्यासाठी बराचसा कालावधी जातो. त्यामुळे शेतक-यांना वेळेत साहित्य मिळत नाही. परिणामी शेतक-यांना रेशीम उद्योग करण्यास अडचणीचा सामना करावा लागतो. ही वस्तुस्थिती लक्षात घेवून वर नमूद दि.२५.०१.२०१२ च्या पत्रान्वये रा.कृ.वि.योजनेंतर्गत अमरावती व ओरंगाबाद जिल्हयातील शेतक-यांना अनुज्ञेय असलेले साहित्य रेशीम संचालनालयामार्फत केंद्रीय पध्दतीने खरेदी न करता थेट उत्पादक/ विक्रेत्याकडून खरेदी करण्यास प्रायोगिक तत्त्वावर मान्यता देण्यात आली होती. याच धर्तीवर रेशीम लाभार्थ्यांना विविध योजने अंतर्गत साहित्य पुरवठ्याबाबतच्या मार्गदर्शक सूचना विहित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

राज्यात रेशीम उद्योगाच्या विकासाकरीता राबविण्यात येणारे केंद्र/राज्य पुरस्कृत विविध योजने अंतर्गत तुती / टसर लागवड, कोष उत्पादन इत्यादीकरीता अंतर्भुत असलेले साहित्य रेशीम संचालनालय स्तरावरून केंद्रिय पद्धतीने खरेदी करून त्याचा पुरवठा शेतक-यांना करण्यात येतो. सन २०१५-१६ पासून सदर पद्धत बंद करण्यात येत आहे. यापुढे विविध योजने अंतर्गत लाभार्थ्याला स्वतः साहित्य खरेदी करण्यास मान्यता देण्यात येत आहे. याबाबत यासाठी खालील सूचना देण्यात येत आहेतः-

१) रेशीम विकासाच्या कोणत्याही योजने अंतर्गत लाभार्थीने विहीत निकष पुर्ण केल्यावर व तो साहित्य मिळण्यासाठी पात्र ठरल्यानंतर प्रत्येक लाभार्थ्याला स्वत: साहित्य खरेदीबाबतचे पत्र देण्यात यावे.

२) लाभार्थ्याला देण्यात येणा-या मंजूर पत्रामध्ये त्याला साहित्यासाठी संबधित योजनातंर्गत अनुज्ञेय अनुदान तसेच कोणकोणते साहित्य किंवा सामुग्री अनुज्ञेय आहे, त्याची संख्या व प्रत्येक सामुग्री / साहित्याचे विनिर्देश (specification) याबाबतची यादी देण्यात यावी.या यादीतील साहित्यापैकी लाभार्थ्यांने त्याला मिळणा-या अनुदानाच्या रकमेच्या मर्यादेत आवश्यक ते साहित्य खरेदी करण्यास त्याला मुभा असल्याचेही पत्रात नमूद करण्यात यावे.

३) या पत्रासोबत निश्चित केलेल्या साहित्य / सामुग्रीच्या पुरवठादारांची यादी ( त्याचा पत्ता तसेच मोबाईल क्रमांकासह ) माहितीकरीता देण्यात यावी. लाभार्थ्यांना या यादी व्यतिरिक्त इतर स्रोताकडूनही साहित्य / सामुग्री खरेदी करण्याची मुभा राहील. याबाबतचा स्पष्ट उल्लेख पत्रामध्ये न चुकता करण्यात यावा. तथापि पत्रामध्ये साहित्याचे जे विनिर्देश (Specification) नमूद करण्यात आले आहे त्या विनिर्देशाचे साहित्य खरेदी करणे लाभार्थ्याला बंधनकारक राहील.

४) मंजुरी प्राप्त झाल्यानंतर लाभार्थ्याने एक महिन्याच्या आत साहित्य / सामुग्री खरेदी करणे बंधनकारक राहिल.

५) लाभार्थी साहित्य / सामुग्री खरेदी नंतर सबंधीत जिल्हा रेशीम अधिकारी यांना साहित्य खरेदीची माहिती देईल. यांनतर रेशीम विकास अधिकारी किंवा त्याच्या अधिपत्याखालील तांत्रिक कर्मचारी त्या लाभार्थ्याच्या साहित्याची पडताळणी विहीत कालावधीत करतील. साहित्य तपासणी करणा-या अधिकारी/ कर्मचारी यांनी साहित्य / बीलाची पडताळणी झाल्यानंतर साहित्य प्रमाणीत करावे. त्यांनतर विहीत कार्यपध्दतीनुसार जिल्हा रेशीम अधिकारी यांनी लाभार्थ्यांला साहित्य अनुदानाची अनुज्ञेय रक्कम त्याचा बँक खात्यात थेट जमा करण्याबाबतची कार्यवाही करावी.

६) विविध योजनेतंर्गत लाभार्थ्यांना साहित्य खरेदीसाठी द्यावयाच्या मंजूरी पत्राचे प्रारुप रेशीम संचालनालयाने सात दिवसाच्या आत सर्व संबधित जिल्हा कार्यालयास उपलब्ध करून द्यावे.

७) या मार्गदर्शक सुचनेनुसार सदर कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संचालक (रेशीम) यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१३१४४७१३५५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas Ramdas Thakur

Digitally signed by Vilas Ramdas Thakur
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=c8b1e52c5c4f922ab6eb7a0b44101c838aea34f29fbff0aebe9d85c3de3468c2, cn=Vilas Ramdas Thakur
Date: 2015.02.21 12:21:22 +05'30'

**( वि.रा.ठाकूर)**
**अवर सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.अ.मु.सचिव ( कृषि व पणन) मंत्रालय, मुंबई .
२. मा.प्रधान सचिव (रोहयो) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
३. उपसचिव (कृषि) तथा सदस्य सचिव, राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषि व पदूम मंत्रालय, मुंबई -३२
४. मा.आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे-४११००१.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य छोटया शेतक-यांचा व्यापारी संघ, पुणे
६. संचालक, कृषि , प्रक्रिया व नियोजन , कृषि आयुक्तालय, म.राज्य पुणे.
७. संचालक (रेशीम) रेशीम संचालनालय, आयूक्त कार्यालय परिसर, नागपूर
८. सर्व सहायक संचालक , प्रादेशीक रेशीम कार्यालय, पुणे, अमरावती, औरंगाबाद व अमरावती.
९. सर्व जिल्हा रेशीम विकास अधिकारी श्रेणी-१/२
१०. रेशीम निवड नस्ती.